**आदिवासी विकास विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या वैयक्तिक लाभाच्या योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना त्यांच्या आधार संलग्नीत बँक खात्यात थेट रक्कम जमा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय, क्र. आविवि-२०१७/प्र.क्र.४०/का.१२,**
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक :- १९ ऑगस्ट, २०१७.

**वाचा:-**

१) महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थसहाय्य, लाभ व सेवा यांचे लक्ष्यित वितरण) अधिनियम, २०१६.
२) आदिवासी विकास विभाग, शासन अधिसूचना,क्रमांक आविवि-२०१७/ प्र.क्र.४०/ का-१२, दिनांक २४ जुलै, २०१७.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्रमांक व्यअप्र-२०१६/प्र.क्र.१२२/का-१२, दिनांक ३१.०३.२०१६.
४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९ / तांशि-४, दिनांक १५.०४.२०१७.
५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक :स्कॉलर-४९१७/प्र.क्र.१४६/मशि-२, दिनांक ०२.०८.२०१७
६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्रमांक आवगृ-२०१७/प्र.क्र.१८/का-१२, दिनांक ०६.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

शासनाव्दारे थेट लाभ हस्तांतरण (DBT) प्रक्रियेवर मोठ्या प्रमाणावर भर देण्यात येत असून याअंतर्गत आधार क्रमांकाचा व्यापक प्रमाणावर वापर करण्यासंदर्भात शासनाचे धोरण आहे. आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध शैक्षणिक योजना तसेच वैयक्तिक लाभाच्या इतर योजनांची अधिक चांगल्या व पारदर्शकपणे पध्दतीने अंमलबजावणी करण्याकरीता व योग्य आणि पात्र लाभार्थ्यांना अचूक लाभ देण्यासाठी लाभार्थ्यांच्या आधार क्रमांकाची व त्याच्या बँक खात्यासंबंधी नोंद असणे आवश्यक आहे.

सध्या महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थ सहाय्य, लाभ आणि सेवा यांचे लक्ष्यित वितरण) अधिनियम, २०१६ अंतर्गत संदर्भाधिन क्र.१ येथील अधिनियमातील तरतूदीनुसार शासनाकडून देण्यात येणारे कोणतेही अर्थसहाय्य, वित्तीय लाभ व सेवाच्या प्रयोजनार्थ संबंधित लाभार्थ्यांचे अधिप्रमाणन करून किंवा पुरावा म्हणून आधार क्रमांक प्राप्त करुन त्या आधारे लाभार्थ्यांच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात लाभाची रक्कम थेट जमा करणे आवश्यक आहे. त्यानुसार आदिवासी विकास विभागामार्फत अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांकरीता राबविण्यात येत असलेल्या आणि संदर्भ क्र.२ येथील अधिसूचनेन्वये

अधिसूचित केलेल्या विविध शैक्षणिक व वैयक्तीक लाभाच्या योजनेंतर्गत लाभार्थ्यांना अर्थसहाय्य, वित्तीय लाभ किंवा सेवा मिळविण्यासाठीची अट म्हणून एखाद्या व्यक्तीची ओळख सिद्ध करण्याच्या प्रयोजनार्थ, अशा व्यक्तीचे अधिप्रमाणन करणे किंवा आधार क्रमांक असल्याचा पुरावा सादर करणे व त्यानुसार देण्यात येणाऱ्या वित्तीय लाभाची रक्कम पात्र लाभार्थ्यांच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात थेट जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थ सहाय्य, लाभ आणि सेवा यांचे लक्षित वितरण) अधिनियम, २०१६ मधील तरतूदी व संदर्भाधिन क्र. २ येथील अधिसूचना विचारात घेता सन २०१७-१८ या वर्षापासून आदिवासी विकास विभागाच्या खालील नमूद केलेल्या योजनांतर्गत पात्र अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना अर्थसहाय्य, वित्तीय लाभ किंवा सेवा मिळविण्यासाठीची एक अट म्हणून एखाद्या व्यक्तीची ओळख सिद्ध करण्याच्या प्रयोजनार्थ, अशा व्यक्तीचे अधिप्रमाणन करणे किंवा आधार क्रमांक असल्याचा पुरावा सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार खालील नमूद केलेल्या योजनांतर्गत देय वित्तीय लाभाची रक्कम ही पात्र लाभार्थ्यांच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात थेट जमा करण्यात यावी.

| अ.क्र. | योजनेचे नाव |
|---|---|
| १ | सुवर्ण महोत्सवी पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना. |
| २ | केंद्र पुरस्कृत मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना. |
| ३ | अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क प्रतिपुर्ती योजना. |
| ४ | व्यावसायिक अभ्यासक्रम संलग्नित निर्वाह भत्ता योजना |
| ५ | शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्क प्रदाने |
| ६ | अपंग विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती व वाहतूक भत्ता योजना |
| ७ | परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजना |
| ८ | पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजना. |
| ९ | शासकीय वसतीगृहातील विद्यार्थ्यांसाठी थेट अनुदान स्वरूपात लाभ देणे. |
| १० | शबरी आदिवासी घरकुल योजना. |

२. सदर प्रयोजनार्थ माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत केंद्रीभूत थेट लाभ हस्तांतरण प्रणाली (State DBT and Service Portal) https://mahadbt.gov.in हे संकेतस्थळ विकसित करण्यात आले असून, यासंदर्भात वेळोवेळी मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यात येईल. सदर State DBT and Service Portal मार्फत प्रथम टप्प्यात उपरोक्त परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या योजनांपैकी अ.क्र.१ ते ७ येथील शिष्यवृत्तीविषयक योजना राबविण्याचे निश्चित झालेले असून त्यानुसार सन २०१७-१८ पासून सदर योजनांतर्गत लाभ मिळण्याकरिता अर्ज करण्यापासून ते देय रक्कम लाभार्थ्यांच्या बँक

खात्यात जमा करण्यापर्यंत सर्व प्रक्रिया राज्यस्तरीय DBT पोर्टलमार्फत करणे अनिवार्य राहील. तसेच अनुक्रमांक ८ व ९ येथील योजनांसाठी विभागाने स्वतंत्र संगणकीय प्रणाली विकसीत केलेली आहे, या प्रणाली State DBT and Service Portal सोबत संलग्न करण्यात येतील. तसेच अनुक्रमांक १० येथील शबरी आदिवासी घरकुल योजना केंद्र शासनाच्या Aawassoft या प्रणालीमार्फत राबविण्यात येत असून त्याअंतर्गत देय रक्कम ग्रामविकास विभागाच्या अखत्यारितील राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण यांच्यामार्फत लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्यात येतील.

३. उपरोक्त १० योजनेपैकी शबरी आदिवासी घरकुल योजना वगळता उर्वरीत ९ योजनांसाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावर स्वंतत्र बँक खाते उघडण्यात यावे. प्रस्तुत शिष्यवृत्ती/ आर्थिक सहाय्य विषयक योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे **"समन्वय अधिकारी"** राहतील. प्रकरणी राज्यस्तरीय योजनांसाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावरील सहाय्यक प्रकल्प अधिकारी हे **"आहरण व संवितरण अधिकारी"** असतील, त्यांनी राज्यस्तरीय योजनातंर्गत वितरीत होणारा निधी आहरीत करून योजनानिहाय स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा. तसेच **जिल्हास्तरीय** योजनांसाठी संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्या कार्यालयातील संबंधित आहरण व संवितरण अधिकारी असतील ,त्यांनी योजनानिहाय निधी आहरीत करून तो आयुक्त स्तरावर उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा. आयुक्त स्तरावर उघडलेल्या योजनानिहाय स्वतंत्र बँक खात्यामधूनच लाभार्थ्यांना थेट लाभाची रक्कम वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. केंद्र पुरस्कृत पोस्ट मॅट्रीक शिष्यवृत्ती योजनंतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तरतुदीनुसार इयत्ता १० वी नंतरच्या मॅट्रिकोत्तर शिक्षणाकरीता अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्क, निर्वाह भत्ता इ. शिष्यवृत्ती देण्यात येते. तसेच केंद्र पुरस्कृत पोस्ट मॅट्रीक शिष्यवृत्ती योजनेच्या उत्पन्न मर्यादेपेक्षा अधिक उत्पन्न असलेल्या (सद्यस्थितीत रूपये २.५० लाखापेक्षा जास्त) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांकरीता राज्यशासनाच्या शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्क प्रतिपुर्ती योजनेंतर्गत संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयानुसार शासन मान्यता प्राप्त खाजगी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमाकरीता शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्तीची योजना राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत व्यावसायिक पदविका, पदवी व पदव्युत्तर पदवीच्या विहीत अभ्यासक्रमांना संबंधित वर्षात शिक्षण शुल्क समिती, प्राधिकरण किंवा परिषदेने निर्धारीत केलेल्या दराप्रमाणे शैक्षणिक शुल्क व परिक्षा शुल्क रकमेची राज्य शासनामार्फत १००% प्रतिपूर्ती करण्यात येते. याशिवाय शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्क प्रदाने या योजनेंतर्गत शासकीय महाविद्यालयातील अभ्यासक्रमाकरीता शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्तीची योजना राज्यामध्ये राबविण्यात येत आहे

५. आता प्रस्तुत प्रकरणी संदर्भाधिन क्र.४ येथील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.१५.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूदीनुसार केंद्र पुरस्कृत मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना , अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क प्रतिपुर्ती योजना तसेच शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्क प्रदाने या योजनांतर्गत अनुज्ञेय शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्काची रक्कम ही संबंधित महाविद्यालये/तंत्रनिकेतने यांना वितरीत करण्याऐवजी शिष्यवृत्ती स्वरूपात थेट विद्यार्थ्याच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात जमा करण्यात यावी. याशिवाय सदर योजनांच्या यापुर्वीच्या सर्व अटी, शर्ती व मार्गदर्शक तरतुदी कायम राहतील. सदर तरतुदीस अनुसरून संदर्भ क्र.३ येथील योजनेस “शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क प्रतिपुर्ती योजना” ऐवजी “शैक्षणिक शुल्क शिष्यवृत्ती योजना” असे संबोधण्यात येईल.

५.१ उपरोक्त शिष्यवृत्ती विषयक योजनांचा लाभ विद्यार्थ्यांना देण्यासाठी संदर्भाधिन ४ येथील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.१५.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार आधार संलग्नीत बायोमॅट्रीक उपस्थिती प्रणाली स्थापित करणे संबंधित शैक्षणिक संस्थाना बंधनकारक असेल. अशा प्रणालीवर सर्व विद्यार्थ्यांची दैनंदीन उपस्थिती नोंदविणे आवश्यक राहील व उच्च व तंत्रशिक्षण विभागाने निश्चित केल्यानुसार किमान उपस्थिती असलेल्या विद्यार्थ्यांना सदर योजनांचा लाभ देय राहील.

५.२ याप्रमाणे अनुसुचित जमातीच्या विद्यार्थ्यांना संबंधित शैक्षणिक वर्षाकरिता मंजूर करण्यात येणारी शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क ,परिक्षा शुल्क इ. ची रक्कम ही दोन हप्त्यामध्ये पात्र लाभार्थी विद्यार्थ्यास मंजूर करण्यात येईल. त्यापैकी सक्षम प्राधिकाऱ्याकडून पहिला हप्ता हा संबंधित शैक्षणिक वर्षातील ३१ ऑगस्ट पर्यंत व उर्वरित दुसरा हप्ता ३१ जानेवारी पर्यंत लाभार्थ्यांच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात जमा करण्यात येईल. तथापि, उपरोक्त मुदतीपूर्वी संबंधित विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/ महाविद्यालय / तंत्रनिकेतने यांनी संबंधित अनुसुचित जमातीच्या विद्यार्थ्यांकडून प्रवेशाच्यावेळी शिक्षण शुल्काची रक्कम घेऊ नये. तसेच कोणत्याही अनुसुचित जमातीच्या विद्यार्थ्यांची पिळवणूक होणार नाही याची योग्य ती दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित शैक्षणिक संस्थाची असेल.

५.३ अनुसुचित जमातीच्या पात्र विद्यार्थ्यांस वरीलप्रमाणे DBT व्दारे पहिल्या हप्त्यात मंजूर रक्कमेच्या ५० % रक्कम प्राप्त होईल. त्यापैकी शिक्षण शुल्कापोटीची मंजूर रक्कम ही संबंधित विद्यार्थ्याने त्यांच्या विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/ महाविद्यालय / तंत्रनिकेतनास तात्काळ अदा करावी व याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित विद्यार्थ्यांची असेल.

५.४ तसेच अनुसुचित जमातीच्या पात्र विद्यार्थ्यांस मंजूर रक्कमेच्या उर्वरित दुसऱ्या हप्त्याची ५०% रक्कम अदा करण्याबाबत आणि विद्यार्थ्यांची परीपूर्ण माहिती (data base) ही प्रस्तावित थेट लाभ हस्तांतरण (DBT) पोर्टलशी जोडण्यासाठी उपलब्ध करून देण्याबाबत

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधिन क्र.४ येथील शासन निर्णयामधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. प्रकरणी पात्र लाभार्थ्यांना अदा करण्यात येणाऱ्या लाभाच्या रक्कमेची वितरण पध्दत संदर्भातील उपरोक्त बदल वगळता विषयांकित योजनांच्या प्रचलित शासन निर्णयान्वये निर्धारीत केलेली अंमलबजावणीची उर्वरित सर्व कार्यपध्दती कायम राहील.

७. उपरोक्त प्रमाणे आधार क्रमांक संलग्नित बँक खात्यावर लाभ देण्याबाबतची कार्यवाही करताना लाभार्थ्याचा आधार क्रमांक, बँक खाते क्रमांक व त्याच्याशी संबंधित कोणतीही वैयक्तीक स्वरूपाची माहिती जाहीरपणे प्रकाशित करू नये, किंवा अशी माहिती ऑनलाईन प्रणालीव्दारे सहजरित्या उपलब्ध होणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी. लाभार्थ्यांना लाभ देण्यापुरताच अशा माहितीचा वापर करण्यात यावा, आणि याविषयी केंद्रीय आधार कायदा, २०१६ तसेच माहिती तंत्रज्ञान कायदा, २००० व त्याखालील नियम २०११ मधील तरतुदीचे पालन करून कार्यवाही करण्यात यावी.

८. शिष्यवृत्ती/आर्थिक सहाय्य योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या लाभाची रक्कम अनुसूचित जमातीच्या पात्र लाभार्थ्यांच्या आधार संलग्नित बँक खात्यात जमा करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहे:-

८.१ उपरोक्त योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांनी ऑनलाईन अर्जासोबत त्यांचा आधार क्रमांक देणे आवश्यक असेल. तसेच ज्या बँक खात्यात पात्र लाभार्थ्यांना रक्कम प्राप्त करुन घ्यावयाची आहे असे बँक खाते आधार क्रमांकाशी संलग्न असल्याची खात्री करुन घ्यावी.

८.२ आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी प्रत्येक योजनेकरीता राष्ट्रीयकृत बँकेत एक स्वतंत्र खाते उघडून त्याव्दारे अनुसूचित जमातीच्या लाभार्थी विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती/आर्थिक सहाय्य विषयक लाभ राज्यस्तरीय DBT पोर्टल मार्फत अदा करण्याची कार्यवाही करावी. सदरील बँक खात्याव्यतिरिक्त इतर कोणतेही खाते प्रकल्प/ विभागस्तरावर ठेवण्यात येऊ नये.

८.३ संबंधित विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/महाविद्यालये/तंत्रनिकेतन/सक्षम प्राधिकारी यांनी उपरोक्त योजनेसंबधीच्या शासन निर्णयान्वये वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तरतुदीनुसार प्राप्त अर्जांची छाननी करावी व डीबीटी पोर्टलवर दर्शविल्याप्रमाणे पुढील कार्यवाही करावी.

८.४ संबंधित विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/महाविद्यालये/तंत्रनिकेतने यांनी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्याचा प्रवेश निश्चित करतांना त्याचा आधार क्रमांक हा संबंधित विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/महाविद्यालये/तंत्रनिकेतने यांच्या सांकेतिक क्रमांकाशी (Unique Number) (AISHE Code अथवा विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/महाविद्यालये/तंत्रनिकेतने यांनी

दिलेला नोंदणीकृत क्रमांक) जोडून त्याआधारे विकसित केलेली विद्यार्थ्याची परिपूर्ण माहिती (Data Base) ही DBT पोर्टलशी जोडण्यासाठी संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांना उपलब्ध करुन द्यावी.

८.५ उक्त योजनेअंतर्गत सध्या लाभ घेत असलेले लाभार्थी व नवीन लाभार्थी यांनी यापुढे राज्यस्तरीय DBT पोर्टलवर नव्याने अर्ज करणे अनिवार्य राहील. या योजनांतर्गत अनुसूचित जमातीच्या पात्र लाभार्थी विद्यार्थ्यांसाठी शिष्यवृत्ती/आर्थिक सहाय्य विषयक रक्कम अदा करतेवेळी लाभार्थी विद्यार्थी, अभ्यासक्रम व विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/ महाविद्यालय/तंत्रनिकेतन निहाय सविस्तर यादी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित शिक्षण संचालनालयाची असेल.

८.६ आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांनी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती/आर्थिक सहाय्य विषयक योजनेची माहिती महाविद्यालयाच्या सांकेतिक क्रमांकासह (Unique Number) (AISHE Code अथवा विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/महाविद्यालये/तंत्रनिकेतने यांनी दिलेला नोंदणीकृत क्रमांक) DBT पोर्टलला जोडण्याची कार्यवाही करावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०८२२१२२९५२५५२४ असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.08.22 12:20:36 +05'30'

**(सु.ना.शिंदे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री , आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री , आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, कृषी व प.दु.म.विभाग, मंत्रालय,मुंबई.
९) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.
१४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१५) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१७) संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२०) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
२१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२२) संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३) संचालक (शिक्षण) महाराष्ट्र कृषी व शैक्षणिक संशोधन परिषद, पुणे.
२४) कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
२५) प्रबंधक, सर्व विद्यापीठे.
२६) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२७) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती.
२८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
२९) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३३) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
३४) सर्व उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३५) निवड नस्ती (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.